वितरण आदेश क्र:-२ डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी,
सन २०१४-१५ अमरावती या संस्थेच्या ई-ग्रंथालय व विस्तारित प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास निधी वितरित करणे.
सहायक अनुदान - सन २०१४-१५ ( योजनांतर्गत )

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :विप्रप्र -२०१४/१११०/प्र.क्र.१९५/१४/१२-अ,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६ मार्च,२०१५

वाचा :- १. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीयुडी-२०१४/प्र.क्र.९१/२०१४/२५, दि.३ जुलै,२०१४
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक :विप्रप्र -२०११/१६२३/प्र.क्र.२६९/ ११/१२-अ दि. ३०.३.२०१२.
३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक :विप्रप्र -२०११/१६२३/ प्र.क्र.२६९/ ११/१२-अ दि. ३१.३.२०१२.
४. विशेष कार्य अधिकारी, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती यांचे पत्र क्र.स.सहा/जा.क्र.२२६/२०१४, दिनांक १०.१२.२०१४ चे पत्र.
५. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज/२०१३ प्र क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.२ जानेवारी,२०१५ व दि.९ फेब्रुवारी,२०१५
६. वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र.जलेशी-२०१३/प्र.क्र.३७६/अर्थ-१२, दि. १९.०४.२०१४

**शासन निर्णय :-**

डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस **"मागणी क्र.ए-४, मुख्य लेखाशीर्ष २०७० -इतर प्रशासनिक सेवा -००३ प्रशिक्षण- राज्य योजनांतर्गत योजना (००) (०५) डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहायक अनुदान ( २०७००६८४ ) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) "** या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता एकूण रु.२२७६.४०/- लाख इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन परिपत्रकान्वये सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षाच्या योजनांतर्गत खर्चासाठी संपूर्ण अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधिन करण्यात आले आहे. संदर्भाधीन क्र.५ च्या परिपत्रकानुसार **एकूण अर्थसंकल्पीय अनुदानाच्या ७५% च्या मर्यादेत, रु.१७०७.३० लाख इतके सहायक अनुदान खर्चाकरिता,** अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

२. संस्थेच्या प्रस्तुत कामास संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये **रु.५,८९,१२,७५२ /- (अक्षरी रुपये पाच कोटी एकोणनव्वद लाख, बारा हजार, सातशे बावन्न फक्त )** एवढया रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मान्यतेच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात

आली आहे. तसेच, संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये **रु. २,३९,१४,०२०/- (अक्षरी रुपये दोन कोटी,एकोणचाळीस लाख,चौदा हजार,वीस फक्त)** इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच, संदर्भाधीन क्र.४ च्या पत्रान्वये संस्थेने सदर काम स्लॅब लेव्हल पर्यंत पूर्ण झाले असून, बांधकाम मार्च २०१५ पर्यंत पूर्ण करण्यात येईल, असे कळविले असून, त्या कामासाठी निधीची मागणी केली आहे.

**३.** डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेच्या ई-ग्रंथालय व विस्तारित प्रशासकीय इमारतीचे बांधकामासाठी **रु. ५,८९,१२,७५२ /- (अक्षरी रुपये पाच कोटी, एकोणनव्वद लाख, बारा हजार, सातशे बावन्न फक्त)** एवढया रकमेच्या प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर योजनांतर्गत खर्चासाठी उपलब्ध असलेल्या निधीपैकी, प्रस्तुत कामासाठी आता उर्वरित **रु.३,४९,९८,७३२/- (अक्षरी रुपये तीन कोटी, एकोणपन्नास लाख,अठ्ठयाण्णव हजार, सातशे बत्तीस फक्त )** एवढा निधी नियोजन व वित्त विभागाने नमूद केलेल्या खालील अटी व शर्तीस अधीन राहून,योजनांतर्गत सहायक अनुदान म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

१. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती यांनी, विशेष कार्य अधिकारी यांना सदर काम मार्च २०१५ पर्यंत पूर्ण करण्याचे कळविल्यामुळे, सदर निधी प्राप्त झाल्यानंतर ई-ग्रंथालय व विस्तारित प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाची पूर्ण जबाबदारी विशेष कार्य अधिकारी यांनी घेऊन सदर काम विहीत कालावधीत पूर्ण करून घेणे.

२. सदर इमारतीची O.C. प्राप्त करुन घेऊन इमारत वापरण्यास सुरुवात करण्यात आली आहे, याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक असेल.

३. तसेच, या सर्व कामांवर झालेल्या प्रशासकीय मान्यतेच्या रु.५,८९,१२,७५२/- (अक्षरी रुपये पाच कोटी, एकोणनव्वद लाख,बारा हजार, सातशे बावन्न फक्त ) एवढया रकमेच्या बाबनिहाय खर्चाचा तपशील आहरण व संवितरण अधिकारी, म्हणून विशेष कार्य अधिकारी यांनी सादर करण्याकरिता त्यांचेवर जबाबदारी निश्चित करण्यात यावी.

४. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ६ च्या शासन परिपत्रकांतील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. या कामासाठी होणारा खर्च मागणी क्र.**"ए-४, मुख्य लेखाशीर्ष २०७०- इतर प्रशासनिक सेवा ००३ -प्रशिक्षण-राज्य योजनांतर्गत योजना(००) (०५) डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहायक अनुदान ( २०७००६८४ ) ३१- सहायक अनुदान(वेतनेतर)"** या लेखाशीर्षाखाली सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**५.** सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर, काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र विहित वेळेत शासनास सादर करावे.

६. आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती यांनी महालेखापाल, लेखापरीक्षा- महाराष्ट्र २, नागपूर यांना आणि शासनास तातडीने सादर करावे.

७. उपरोक्त अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, लेखापरीक्षा-महाराष्ट्र २, नागपूर यांना राहतील आणि त्याकरिता संबंधित संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या मान्यतेने अनुक्रमे अनौ. संदर्भ क्र.७१/ १४४३, दि. ०७.०३.२०१५ व अनौ.संदर्भ क्र.२६३/१५/व्यय ४, दि.१८.३.२०१५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१५०३२६१३१७४४२३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PATIL PRATIBHA MADHAV

Digitally signed by PATIL PRATIBHA MADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GAD,CID - 916982, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=da026e85ae8cbb4e3c2acdbecbbf2f6d6cb0ae6ed5c1e54483490119ee0456ad, cn=PATIL PRATIBHA MADHAV
Date: 2015.03.26 15:47:55 +05'30'

**( प्रतिभा मा. पाटील )**

**कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग.**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३) मा.अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) मा.प्र.स.,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
५) मा.प्र.स.वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
६) विभागीय आयुक्त, अमरावती
७) विशेष कार्य अधिकारी, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
८) उप संचालक, लेखा व कोषागारे, अमरावती
९) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
१०) नियोजन विभाग, कार्यासन-१४४३
११) वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
१२) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
१३ ) निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/कार्या. १२ अ)